**सातव्या वेतन आयोगाच्या शिफारशींच्या अनुषंगाने अखिल भारतीय सेवेतील महाराष्ट्र संवर्गातील अधिकाऱ्यांना थकबाकीची रक्कम प्रदान करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः भाप्रसे-१११६/प्र.क्र.१७५/२०१६/९-अ

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
तारीख: २७.१०.२०१६.

**वाचा :**

१) केंद्र शासन, कार्मिक व प्रशिक्षण विभागाची दिनांक ८.९.२०१६ च्या राजपत्रात प्रसिद्ध करण्यात आलेली भा.प्र.से.(वेतन) नियम, २०१६ ची अधिसुचना.
२) केंद्र शासन, कार्मिक व प्रशिक्षण विभागाची दिनांक ९.९.२०१६ च्या राजपत्रात प्रसिद्ध करण्यात आलेली भा.प्र.से.(वेतन) नियम, २०१६ चे शुध्दिपत्र.
३) केंद्र शासन, कार्मिक व प्रशिक्षण विभागाची दिनांक २३.९.२०१६ च्या राजपत्रात प्रसिद्ध करण्यात आलेली भा.पो.से.(वेतन) नियम, २०१६ ची अधिसुचना.
४) केंद्र शासन, कार्मिक व प्रशिक्षण विभागाची दिनांक २८.०९.२०१६ च्या राजपत्रात प्रसिद्ध करण्यात आलेली भा.व.से.(वेतन) नियम, २०१६ ची अधिसुचना
५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-भाप्रसे-१११६/प्र.क्र.१७५/२०१६/९-अ, दिनांक ०१.१०.२०१६.

**प्रस्तावना :**

सातव्या वेतन आयोगाच्या शिफारशींच्या अनुषंगाने अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांची वेतननिश्चिती करण्याकरिता केंद्र शासनाच्या कार्मिक, लोक तक्रारी तथा निवृत्ती वेतन मंत्रालय, कार्मिक व प्रशिक्षण विभागाच्या उपरोक्त नमूद अधिसूचनांनुसार १) भारतीय प्रशासन सेवा (वेतन) नियम, २०१६, २) भारतीय पोलीस सेवा (वेतन) नियम, २०१६ आणि ३) भारतीय वन सेवा (वेतन) नियम, २०१६ निर्गमित करण्यात आलेले आहेत. सदर नियम दि. १.१.२०१६ पासून अंमलात आलेले आहेत. सदर नियमांच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्रमांक-५ येथे नमूद शासन निर्णयान्वये महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांना प्रसृत नियम लागू करण्यात आले आहेत. त्यानुसार महाराष्ट्र संवर्गातील भाप्रसे / भापोसे / भावसे अधिकाऱ्यांचे वेतन दि. १.१.२०१६ पासून सुधारित करण्यात येऊन सुधारित वेतन दि. १.१०.२०१६ पासून प्रदान करण्याचा आणि दिनांक १.१.२०१६ ते दिनांक ३०.९.२०१६ पर्यंतच्या कालावधीतील वेतन सुधारणेमुळे देय ठरणाऱ्या थकबाकीची १००% रक्कम माहे ऑक्टोबर-२०१६ च्या वेतनातून रोखीने एकरकमी प्रदान करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. तद्नुषंगाने काही अधिकाऱ्यांकडून सदर थकबाकीची रक्कम भविष्य निर्वाह निधीमध्ये जमा करण्याबाबतचा पर्याय उपलब्ध करून देण्यासंदर्भात होणारी विचारणा लक्षात घेऊन शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांना ७ व्या वेतन आयोगानुसार दिनांक ०१.०१.२०१६ ते ३०.०९.२०१६ पर्यंतच्या कालावधीतील वेतन सुधारणेमुळे देय होणारी थकबाकीची पूर्ण रक्कम अथवा सदर थकबाकीचा काही भाग ऐच्छिकरित्या त्यांच्या भविष्य निर्वाह निधीच्या खात्यात जमा करण्यास अखिल भारतीय सेवा (निर्वाह निधी) नियम, १९५५ मधील नियम क्रमांक २ (g) (iii) आणि ३५ नुसार नियम क्रमांक ६ (३) (b) शिथील करून मुभा देण्यात येत आहे.

२. तसेच ज्या अखिल भारतीय सेवेतील अधिका-याना वरीलप्रमाणे देय होणारी थकबाकीची रक्कम या शासन निर्णयाच्या दिनांकापूर्वीच रोखीने प्रदान केली असल्यास अशा अधिका-यांना सदर थकबाकीची पूर्ण रक्कम अथवा सदर थकबाकीचा काही भाग ऐच्छिकरित्या त्यांच्या भविष्य निर्वाह निधीच्या खात्यात या शासन निर्णयाच्या दिनांकापासून पुढील तीन महिन्याच्या कालावधीत जमा करता येईल.

३. वरीलप्रमाणे कार्यपध्दती अवलंबिताना अखिल भारतीय सेवेतील संबंधित अधिका-याकडून लेखी स्वरुपात अर्ज प्राप्त करून घेण्याची जबाबदरी संबधित आंहरण व संवितरण अधिका-याची राहील.

४. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६९४/व्यय-४, दि.२७.१०.२०१६ च्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१०२७१६३५२८५७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mukesh Khullar

Digitally signed by Mukesh Khullar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6481e097db98eaae8b0580130544ebced12d1340cea24fcd0132235fb0c544a8, cn=Mukesh Khullar
Date: 2016.10.28 11:41:46 +05'30'

**( मुकेश खुल्लर )**
**प्रधान सचिव (सेवा)**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर
५. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर

६. संचालक, लेखा व कोषागारे,मुंबई

७. अधिदान व लेखा अधिकारी,वांद्रे/मुंबई

८. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.

९. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/ नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक / अमरावती / ठाणे,

१०.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

११.सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,

१२.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

१३.वित्त विभाग/ सेवा-४, अर्थसंकल्प-२५, व्यय-४

१४.सहायक संचालक (लेखा) (भापोसे कक्ष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२

१५.सहायक संचालक (लेखा) (भावसे कक्ष), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२

१६.महासंचालक आणि पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई

१७.प्रधान मुख्य वन संरक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे

१८.विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस मार्ग, नवी दिल्ली

१९.संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई-४००००४

२०.सामान्य प्रशासन विभाग/ कार्यासन ९, १०, १९ व २६

२१.निवड नस्ती.